मराठवाडा पॅकेजच्या धर्तीवर पहिल्या टप्यात उस्मानाबाद, यवतमाळ, गोंदिया व सातारा आणि दुस-या टप्यात बीड व भंडारा या जिल्ह्यांमध्ये ०२ देशी / संकरीत गाई आणि ०२ म्हशींचा गट वाटप करणे या योजनेच्या अंमलबजावणीबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास, मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र. १४७/पदुम-४,**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : २५ फेब्रुवारी, २०२२.**

**वाचा** :- १. कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास, मत्स्यव्यवसाय विभागाचा शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१६/प्र.क्र.२३८/पदुम-४, दि.१६ नोव्हेंबर, २०१७.
२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. पशुधन-१ / प्र.क्र. ५९६/ म.पॅ. / ५८ / पसं-१३, पुणे दि. ०१.०१.२०२१.

**शासन निर्णय :-**

वाचा १ येथील दि.१६.११.२०१७ च्या शासन निर्णयातील पृ.क्र.४ वरील या योजनेअंतर्गत खरेदी करावयाच्या देशी / संकरीत गायी आणि म्हशींचे गट परराज्यातून खरेदी करण्यात यावेत या ऐवजी खालीलप्रमाणे वाचावे.

"या योजनेअंतर्गत खरेदी करावयाच्या देशी / संकरीत गायी आणि म्हशींचे गट राज्यातून किंवा परराज्यातून खरेदी करण्यात यावेत. दुधाळ जनावरांचा गट राज्यातून खरेदी केल्यास अशा प्रकरणी परराज्यातून गट खरेदी केल्यानंतर वाहतुकीसाठी देय असलेला वाहतूक खर्च अनुज्ञेय राहणार नाही."

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असुन त्याचा संकेतांक क्र. २०२२०२२५१५३२३१२१०१ आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमीत करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,**

DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE

Digitally signed by DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=690002a7555559bb015f315b03adb3305c59fe381e4dcda1439d119129672733, pseudonym=B6831977DAFE9C462B1F5207DB8DC23334F34E62, serialNumber=5DBCE7AE3AC30F0E55C90CD14E851251037DC61F3291C80EA8638C44D41143AA, cn=DR. SANJAY VISHWANATHRAO DOIJODE
Date: 2022.02.28 11:44:35 +05'30'

**(डॉ. संजय वि. डोईजोडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई-३२.
२. मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई-३२.

३. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई-३२.
४. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे-७.
५. विभागीय आयुक्त, पुणे, नागपूर, अमरावती, लातूर व औरंगाबाद विभाग.
६. जिल्हाधिकारी, उस्मानाबाद, यवतमाळ, गोंदिया, सातारा, बीड व भंडारा
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, उस्मानाबाद, यवतमाळ, गोंदिया, सातारा, बीड व भंडारा
८. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
९. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र पशुधन विकास मंडळ, नागपूर.
११. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, पुणे, नागपूर, अमरावती, लातूर व औरंगाबाद विभाग.
१२. जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, उस्मानाबाद, यवतमाळ, गोंदिया, सातारा, बीड व भंडारा
१३. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, उस्मानाबाद, यवतमाळ, गोंदिया, सातारा, बीड व भंडारा.
१४. अवर सचिव, (पदुम-३), कक्ष अधिकारी (पदुम-१,२,१६ व लोलेस) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती (पदुम-४)